**होमगार्ड संघटनेतील स्वयंसेवकांना**
**पुनर्नियुक्ती देण्याबाबत ......**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग (विशेष)

शासन निर्णय क्र.एचजीएस -०३१०/प्र.क्र.४९/विशा-८,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक १३ जुलै, २०१०.

**वाचावे :** शासन निर्णय क्रमांक: एचजीएस-२००८/प्र.क्र.२४६/विशा-८ दि.१५.४.२०१०

**प्रस्तावना :-**

मुंबई होमगार्डस अधिनियम-१९४७ अन्वये राज्यामध्ये होमगार्ड संघटना आस्तिवात आलेली आहे. तसेच मुंबई होमगार्ड नियम १९५३ अन्वये या संघटनेसाठी नियम विहित करण्यात आलेले आहेत. या नियमातील अटी पूर्ण करणा-या उमेदवारांस, ३ वर्षाच्या कालावधीकरिता संघटनेत सभासद म्हणून नोंदणी केली जाते.

मुंबई होमगार्ड नियम १९५३ मधील नियम ८ अन्वये, नियुक्ती केलेली व्यक्ती ही **पुनर्नियुक्तीस** पात्र असेल, अशी तरतूद आहे. होमगार्ड ही मानसेवी संघटना आहे. स्वयंसेवक हे पूर्णवेळ शासकिय कर्मचारी नाहीत, इच्छुक नागरिक या संघटनेत राष्ट्रीय सेवा करण्याच्या भावनेने प्रेरीत होवून संघटनेत स्वयंसेवक म्हणून कार्यरत असतात. किती कालावधीसाठी स्वयंसेवक म्हणून संघटनेत कार्यरत रहावे, तसेच पात्र स्वयंसेवकांना पुनर्नियुक्ती देण्यासाठी अधिकाराबाबत सक्षम प्राधिकारी विहित करणे, याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

होमगार्ड स्वयंसेवकांना दिल्या जाणाऱ्या प्रशिक्षणामध्ये कवायत, शस्त्र कवायत, पोलीस खात्यासोबत काम करणे व विविध कर्तव्य पार पाडणे इत्यादीचा

RO7M H 1478 (300-7-2010)

समावेश आहे. म्हणून जास्तीत जास्त नागरीकांना होमगार्ड स्वयंसेवक म्हणून कार्य करुन समाजात एक शिस्तबध्द व कोणत्याही आणिबाणीच्या प्रसंगी प्रशिक्षित कॅडर उपलब्ध होऊन, मानसेवी संघटनेचे अस्तित्व कायम राहण्यासाठी, **यापुढे** संघटनेत पुनर्नियुक्तीने स्वयंसेवक कार्यरत राहण्यासाठीचा कालावधी व पुनर्नियुक्ती देण्याबाबतचे अधिकार खालील प्रमाणे राहतील :-

| क्र. | कालावधी | पुनर्नियुक्ती देण्याचे अधिकार |
|---|---|---|
| १ | ३ वर्ष संघटनेतील सभासदत्व संपुष्टात आल्यानंतर, पून्हा ३ वर्षासाठी ........ | संबधित जिल्हा समादेशक होमगार्ड / समादेशक होमगार्ड, बृहन्मुंबई. |
| २ | **सहा वर्ष** झाल्यानंतर, पुढील ६ वर्षासाठी... | महासमोदशक/ उपमहासमादेशक होमागार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई. |
| | **संघटनेत एकूण १२ वर्ष..** | |

२. होमगार्ड संघटनेत स्वयंसेवक जास्तीत जास्त १२ वर्षे संघटनेत कार्यरत राहील. **हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून, वरील कार्यपध्दती अमलात येईल.**

३. जिल्हा समादेशक होमगार्ड / समादेशक होमगार्ड बृहन्मुंबई यांच्यासह महासमादेशक होमगार्ड यांनी खालील प्रमाणे पुनर्नियुक्ती दिल्याच्या संदर्भातील मासिक अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास सादर करावा.

अ) ३ वर्षानंतर / ६ वर्षानंतर पुनर्नियुक्ती **नाकारलेल्या** स्वयंसेवकांचे नाव / नियुक्तीचा दिनांक / शैक्षणिक पात्रता / व्यवसाय इत्यादीबाबतची माहिती सादर करावी.

ब) ३ वर्षानंतर / ६ वर्षानंतर पुनर्नियुक्ती **दिलेल्या** स्वयंसेवकांचे नाव / नियुक्तीचा दिनांक / शैक्षणिक पात्रता / व्यवसाय इत्यादीबाबतची माहिती सादर करावी.

क) ज्यांची नवीन नोंदणी केली आहे, त्यांच्या बाबतीतील वरील प्रमाणे तपशील सादर करावा.

४. होमगार्ड भरती करण्याबाबत, होमगार्ड संचालनालयाने जिल्हानिहाय लक्षसंख्या विहित केली आहे. केवळ संघटनेतील १२ वर्षाचा कालावधी पुर्ण झाला म्हणून सरसकट स्वयंसेवकांना कमी न करता, जिल्ह्यातील लक्षसंख्या कमी होणार नाही याचीही दक्षता घ्यावी. यासाठी संघटनेतील १२ वर्ष पूर्ण होणाऱ्या स्वयंसेवकाएवढेच स्वयंसेवक संघटनेत नव्याने भरती होण्यासाठी वेळीच भरती मोहीम राबविण्यात यावी. तसेच मुंबई होमगार्ड अधिनियमातील कलम ९ नुसार वयाच्या ५५ वर्षापर्यंत स्वयंसेवक संघटनेत कार्यरत राहण्यासाठी विहित केलेली तरतूद देखील पुनर्नियुक्ती देतेवेळी विचारात घेणे आवश्यक राहील.

५. शासन अधिसुचना दि.१८.२.२००६ अन्वये इ.४ थी एवजी इ.८ वी उत्तीर्ण अशी शैक्षणिक अट होमगार्ड भरतीसाठी विहित करुनही बऱ्याच प्रमाणात अपात्र स्वयंसेवक पटावर कार्यरत असल्याचे दिसून येत आहे. पटावरील स्वयंसेवक हे शैक्षणिक दृष्ट्या सक्षम असणे आवश्यक असल्याबाबत केंद्र शासनाचे निदेश विचारात घेवून, सुधारित इ.१० वीच्या अटी प्रमाणे संघटनेत स्वयंसेवकांना भरती करुन घेणे तसेच पुर्ननियुक्ती देताना देखील अटीनुसार कार्यवाही होण्याबाबत संदर्भाधीन शा.नि.दि.१५.४.२०१० अन्वये निदेश देण्यात आले आहेत.

५. तथापि, बऱ्याच प्रमाणात संघटनेतील पटावरील कार्यरत स्वयंसेवक इ.१० वी उत्तीर्ण ह्या सुधारित शैक्षणिक अटीनुसार कार्यरत राहण्यास पात्र ठरत नसल्याने त्यांचे सभासदत्व रद्द केल्यास, संघटनेतील स्वयंसेवकांच्या पटसंख्येवर विपरित परिणाम होईल. तसेच, पोलीसांच्या मागणीप्रमाणे बंदोबस्तकामी आवश्यकतेनुसार स्वयंसेवकांना कर्तव्यार्थ नियुक्त करण्यास अडचणी येणार असल्याबाबतची

H 1478(300-7-2010) [illegible]

६७३
संगणक कक्ष.



वस्तुस्थिती विचारांत घेवून **इयत्ता १० वी ही सुधारित शैक्षणिक अट केवळ संघटनेतील यापुढे नव्याने भरती होणाऱ्या स्वयंसेवकासाठीच लागू राहील.**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**( सदानंद जाधव )**

उप सचिव, गृह विभाग (विशेष), महाराष्ट्र शासन

प्रति,

- मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
- मा.राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
- अ.मु.स. (गृह) यांचे स्वीय सहाय्यक.
- महासमादेशक, होमगार्ड व संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
- प्रधान सचिव, (विशेष) यांचे स्वीय सहाय्यक.
- सर्व अप्पर पोलीस अधिक्षक.
- समादेशक होमगार्ड, बृहन्मुंबई, मुंबई.
- सर्व जिल्हा समादेशक, होमगार्ड.
- समादेशक, मध्यवर्ती प्रशिक्षण संस्था, होमगार्ड, घाटकोपर, मुंबई.
- संगणक कक्ष , गृह विभाग, मंत्रालय.शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्याबाबत कार्यवाहीसाठी अग्रेषित.
- निवड नस्ती विशा-८.

- - - - -

H 1478 - 25